महाराष्ट्र शिक्षण सेवा, गट-अ (प्रशासन शाखा) या संवर्गातील शिक्षणाधिकारी व तत्सम या पदावर परिविक्षाधीन कालावधी पूर्ण करण्याबाबत.
श्रीमती भावना पाटीलबुवा राजनोर, शिक्षणाधिकारी

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:-पकास-२४२५/प्र.क्र.५६/प्रशा-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : १५ मे, २०२५.

वाचा :-

१.शा.शि.व क्री.वि.,शा.नि.क्र.ससेप्र-४३०२/प्र.क्र.७०/प्रशा-२, दिनांक-०८.०८.२०१३.
२.मा. न्यायाधिकरण प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई यांचे मूळ अर्ज क्र. ९२५/२०१७, मधील दिनांक २८.०७.२०२३ रोजीचे आदेश.
३.आयुक्त शिक्षण यांचे पत्र क्र.आस्था-अ/टे.क्र.१०६/परि.काला/राजनोर/२०२५/६८३, दिनांक ०७.०२.२०२५.

**प्रस्तावना** :-

उपरोक्त वाचा येथे नमूद अ. क्र.१ येथील दिनांक ०८.०८.२०१३ च्या शासन निर्णयान्वये सरळसेवेने महाराष्ट्र लोकसेवा आयोग पुरस्कृत उमेदवारांची महाराष्ट्र शिक्षण सेवा (प्रशासन शाखा) गट-अ संवर्गात शिक्षणाधिकारी व तत्सम या पदावर दिनांक ०१.०७.२०१३ पासून नियुक्ती देण्यात आली होती. सदर ७१ अधिकाऱ्यांपैकी सेवापुर्व प्रशिक्षण धारेणाअंतर्गत प्रशिक्षण पूर्ण करण्याऱ्या ६८ अधिकाऱ्यांना शासन निर्णय दि.०८.०८.२०१३ अन्वये पदस्थापना देण्यात आल्या आहेत. त्यानुसार श्रीमती भावना राजनोर यांना दिनांक ०१.०७.२०१३ पासून शासन सेवेत नियुक्ती देण्यात आलेली आहे. शासन निर्णयानुसार रुजू झालेल्या ६८ उमेदवारांना परिविक्षाधीन कालावधी समाप्त करणेबाबतचा प्रस्ताव शासनास सादर करण्यात आला होता. परंतु श्री.दत्तात्रय कारभारी गुंजाळ यांनी महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने शिफारस केलेल्या बहुसंख्य उमेदवारांनी चुकीची नॉन क्रिमीलेअर प्रमाणपत्र सादर केल्याबाबत तसेच खोटी माहिती शासनास देऊन नॉन क्रिमीलेअर प्रमाणपत्र मिळवून त्याआधारे आरक्षणाचा फायदा घेऊन नियुक्ती मिळविली आहे. त्या विरोधात मा.महाराष्ट्र प्रशासकीय प्राधिकरण, मुंबई येथे मूळ अर्ज क्रमांक ९२५/२०१७ दाखल करुन त्यात निवेदनात असे नमूद करण्यात आले कि, संबंधित शिक्षणाधिकारी यांचा परिविक्षाधीन कालावधी पूर्ण करु नये, केल्यास तो न्यायालयाचा अवमान ठरेल व कायद्याचा भंग होईल व ही आपली वैयक्तिक जबाबदारी असेल, याची नोंद घ्यावी असे नमूद करण्यात आले होते. श्री.गुंजाळ यांनी मा.महाराष्ट्र

प्रशासकीय प्राधिकरण, मुंबई यांचेकडे सादर केलेल्या तक्रारीमुळे श्रीमती राजनोर, यांचा परिविक्षाधीन कालावधी समाप्त झालेला नाही. मा. महाराष्ट्र प्रशासकीय प्राधिकरण, मुंबई यांचे मूळ अर्ज क्र.९२५/२०१७ मध्ये प्रतिवादी क्र.४८ वर श्रीमती राजनोर यांचा समावेश आहे. मा.महाराष्ट्र प्रशासकीय प्राधिकरण, मुंबई यांचे मूळ अर्ज क्र.९२५/२०१७ मधील आदेश दि.२८.०७.२०२३ अन्वये न्यायालयाने सदरचा मूळ अर्ज फेटाळल्यात आला आहे. त्यानुषंगाने सामान्य प्रशासन विभागाच्या परिविक्षा धोरणानुसार श्रीमती राजनोर यांचा परिविक्षाधीन कालावधी पूर्ण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार शासनाने पुढील प्रमाणे निर्णय घेतला आहे :-

**शासन निर्णय** :

शासनाच्या प्रचलित धोरणानुसार परिविक्षाधीन कालावधीच्या अटींची पूर्तता करणाऱ्या, दिनांक ०८.०८.२०१३ रोजीच्या शासन निर्णयान्वये सरळसेवेने महाराष्ट्र शिक्षण सेवा (प्रशासन शाखा) गट-अ संवर्गात शिक्षणाधिकारी व तत्सम या पदावर कार्यरत खालील प्रपत्रामध्ये नमूद अधिकाऱ्याचा त्यांच्या नावासमोर रकाना क्रमांक ७ मध्ये नमूद दिनांकास परिविक्षाधीन कालावधी पूर्ण करण्यात येत असून रकाना क्रमांक ८ मध्ये नमूद दिनांकास त्यांची सेवा पुढे चालू ठेवण्यास शासन मंजूरी प्रदान करण्यात येत आहे.

| अ. क्र. | अधिकाऱ्याचे नांव | शासन सेवेत नियुक्ती केलेल्या आदेशाचा दिनांक | शासन सेवेत रुजू झाल्याचा दिनांक | रकाना-४ मधील दिनांकानुसार परिविक्षा कालावधी पूर्ण होण्याचा दिनांक | परिविक्षा कालावधीत घेतलेली अर्जित/परिवर्तीत रजा व कालावधी | रकाना-६ मधील कारणामुळे वाढलेला परिविक्षा कालावधी पूर्ण होण्याचा दिनांक | परिविक्षा कालावधीत समाधानकारक रित्या पूर्ण केल्यामुळे शासन सेवा ज्या दिनांकापासून पुढे चालू ठेवावयाची आहे तो दिनांक |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| १. | श्रीमती भावना पाटीलबुवा राजनोर | ०८.०८.२०१३ | १.०७.२०१३ | ३०.०६.२०१५ | १३ दिवस अर्जित रजा | १३.०७.२०१५ | १४.०७.२०१५ |

२. परिविक्षाधीन कालावधी पूर्ण करणाऱ्या अधिकाऱ्यांना वार्षिक वेतनवाढी देण्यात याव्यात. तसेच संबंधितांच्या सेवापुस्तकात याची नोंद घेण्यात यावी.

३. मा.महाराष्ट्र प्रशासकीय प्राधिकरण, मुंबई यांचे मूळ अर्ज क्र.९२५/२०१७ मधील अंतिम निर्णयाच्या अधिन राहून, सदर अधिकाऱ्यांचा परिविक्षाधीन कालावधी संपुष्टात आणण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२५०५१५१५५८३९७६२१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

DNYANESHWAR ASARAJI AVHAD

Digitally signed by DNYANESHWAR ASARAJI AVHAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=190ce31a764c50caee9a11b81ac560fc0d85bb0ebc377f46c4fc0040aae47135, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=05AE42076719D0FCE5DC8ACF3A44FBA50819DD0D088B25A2D0D7CDE0256A48B0, cn=DNYANESHWAR ASARAJI AVHAD
Date: 2025.05.15 15:59:34 +05'30'

**( ज्ञानेश्वर आव्हाड )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
२) सर्व शिक्षण संचालक
३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
४) सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक
५) संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.
६) संबंधित अधिकारी ( आयुक्त शिक्षण यांचे कार्यालया मार्फत)
७) निवडनस्ती.